रु.६.४९ करोडचे हिरे व हिऱ्यांचे दागिने चोरणाऱ्या सक्रिय गुन्हेगारांना अल्पावधीत अटक करुन हिरे हस्तगत करणाऱ्या पोलीस अधिकारी व अंमलदारांना विशेष बाब म्हणून रोख रक्कमेची बक्षिसे देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एडब्यूडी-०११४/प्र.क्र.३२९/पोल-०१**
३० वा मजला, जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, मुंबई-४००००५.
तारीख: ०६ जानेवारी, २०१५

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः गृह विभाग, क्र.जीओआर-०६९४/सीआर-२४/पोल-१०, दिनांक ३०.०८.१९९६
२) शासन निर्णय क्रमांकः गृह विभाग, क्र.जीओआर-१३०५/प्र.क्र.५०९/पोल-१, दिनांक ०७.०५.२००८
३) पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई यांचे पत्र क्र.कक्ष-१२/गु.प्र.शा./पोआ/२०१४/६२५, दिनांक १७.०९.२०१४ व दिनांक २१.१०.२०१४

प्रस्तावना-

कस्तुरबा मार्ग पोलीस ठाणे, बोरीवली (पूर्व) च्या हद्दीत दिनांक ०९.०५.२०१४ रोजी सायंकाळी ०४.१५ वाजताचे सुमारास एस.आर. सिक्युरिटी कंपनीचे सुपरवाझर व तीन स्टाफ हे मल्का अमित जे.के. लॉजेस्टीक कंपनीच्या बोलेरो गाडीतून मल्का अमित जे.के. लॉजेस्टीक कंपनी, सुरत यांनी पाठविलेले कस्टम सिलबंद केलेले दोन बॉक्स (हिरे व हिऱ्याचे पेंडंट असलेले एकूण २६१ नग, किंमत रु.६.५९ करोड) दागिने बोरीवली (पूर्व ) येथून घेऊन मल्का अमित जे.के. लॉजेस्टीक कंपनीच्या बी.के.सी. बांद्रा मुंबई येथील कार्यालयात जात असताना ड्रायव्हरने गाडीचे चाक तपासण्यासाठी नॅशनल पार्क, बोरीवलीच्या मेनगेटसमोर मुख्य रस्त्यावर गाडी थांबवली असता, पाच अनोळखी इसम तीन अग्नीशस्त्र (Pistol) व चॉपरच्या धाकाने गाडीतील सुपरवाझर व स्टाफला गाडीच्या बंद ट्रॉलीमध्ये कोंबून ठेवले. त्यानंतर दरोडेखोरांनी गाडी पळवून वज्रेश्वरी रोड येथे नेऊन त्यातील हिरे व हिरेजडीत

पेंडट्स असलेली बॅग घेऊन गेले. या गुन्हयाची कस्तुरबा पोलीस ठाणे येथे गु.र.क्र.१५४/१४ कलम ३९५,३९७,३६३,३४२, भारतीय दंड विधान संहिता सह कलम ३,२५ भारतीय हत्यार कायदयानुसार नोंद करण्यात आली. प्रस्तुत गुन्हयाचे गांभीर्य व व्यापकता पहाता, हा गुन्हा पुढील तपासाकरीता गुन्हे प्रकटीकरण शाखा, कक्ष-१२ यांच्याकडे गु.र.क्र.४२/२०१४, दिनांक २४.०५.२०१४ अन्वये वर्ग करण्यात आला.

२. गु.र.क्र.४२/२०१४ या गुन्हयातील आरोपींना अटक करुन त्यांच्याकडून चोरीस गेलेल्या हिऱ्यांच्या किंमतीपैकी रु.५.६५ करोडचे हिरे व हिरेजडित पेंडट्स तसेच गुन्ह्याच्या वेळी वापरण्यात आलेली पिस्तुल, चॉपर, कट्टे, १२ काडतुसे, चोरलेले ३ मोबाईल हँडसेट्स व गुन्ह्याच्यावेळी वापरण्यात आलेली तवेरा गाडी हस्तगत करण्यात आली. अतिशय किचकट व वेगळया कार्यपध्दतीच्या गुन्ह्याची उकल कमी कालावधीत करुन सक्रीय गुन्हेगारांना पकडण्यात गुन्हे प्रकटीकरण शाखा, कक्ष -१२ यांनी यश मिळविले आहे. सदर बाब निश्चितच अभिमानास्पद व कौतुकास्पद असल्याने या गुन्हयाच्या तपासात सक्रिय असलेल्या अधिकारी/ अंमलदाराना रोख रक्कमेची बक्षिसे मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

उपरोक्त गुन्हयाचा यशस्वी तपास करणा-या “परिशिष्ट-अ” येथे नमूद केलेल्या २८ पोलीस अधिकारी/ कर्मचाऱ्यांना प्रशस्तीपत्रकासह एकूण रु.५,००,०००/- (रुपये पाच लाख फक्त) इतक्या रोख रक्कमेची बक्षिसे “एक विशेष बाब” म्हणून मंजूर करण्यात येत आहेत.

२. शासन निर्णय, गृह विभाग, दिनांक ३०.०८.१९९६ च्या “परिशिष्ट- अ” मध्ये नमूद केलेल्या मार्गदर्शक तत्वातील ३) फ) (७) येथील अट “कोणत्याही कर्मचाऱ्याला त्याच्या एका महिन्याच्या एकत्रित वेतनापेक्षा जास्त रक्कम बक्षिस म्हणून देण्यात येवू नये” या प्रकरणी शिथिल करण्यात येत आहे.

३. यावर होणारा खर्च, मागणी क्र. बी-१ "२०५५-पोलीस (००)(१०१) गुन्हे अन्वेषण व दक्षता (००)(०१) गुन्हे अन्वेषण विभाग, बृहन्मुंबई (२०५५ ००३ २) ०५- बक्षिसे" या लेखाशिर्षातून चालू आर्थिक वर्षात उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयातील परिशिष्ट-अ मधील (ई) नुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५००/१४/व्यय-७, दिनांक ०२.१२.२०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०६१६२७३९२७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila Devendra Chaudhari

Digitally signed by Charushila Devendra Chaudhari
DN: CN = Charushila Devendra Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home
Date: 2015.01.06 17:56:36 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
शासनाच्या अवर सचिव

प्रत,

१. मा.मुख्य मंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
५. उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
८. सहाय्यक संचालक, भापोसे कक्ष, ३० वा मजला, सेंटर,१, जा.व्या.केंद्र, कफ परेड, मुंबई.४००००५
९. निवड नस्ती/पोल-१

गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक: एडब्यूडी-०११४/प्र.क्र.३२९/पोल-०१

दिनांक:- ०६ जानेवारी, २०१५ चे सहपत्र

**परिशिष्ट-अ**

| अ.क्र. | अधिकारी/ अंमलदाराचे नांव | पदनाम | बक्षिसाची रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १. | श्री.प्रफुल्ल भोसले | सहायक पोलीस आयुक्त | रु.४०,०००/- |
| २. | श्री. मिलिंद खेतले | प्रभारी पोलीस निरीक्षक | रु.३०,०००/- |
| ३. | श्री. अशोक खोत | प्रभारी पोलीस निरीक्षक | रु.३०,०००/- |
| ४. | श्री. संदीप विश्वासराव | पोलीस निरीक्षक | रु.३०,०००/- |
| ५. | श्री. मनोहर दळवी | सहायक पोलीस निरीक्षक | रु.६०,०००/- |
| ६. | श्री.विजय ढमाळ | सहायक पोलीस निरीक्षक | रु. २५,०००/- |
| ७. | श्री. अनिल ढोले | सहायक पोलीस निरीक्षक | रु.२५,०००/- |
| ८. | श्री. विजय कांदळगांवकर | सहायक पोलीस निरीक्षक | रु.२५,०००/- |
| ९. | श्री. राहुल देशमुख | सहायक पोलीस निरीक्षक | रु.२५,०००/- |
| १० | श्री. रामचंद्र कानडे | पोलीस उप निरीक्षक | रु.२०,०००/- |
| ११. | श्री. विजय आंबेकर | पोलीस उप निरीक्षक | रु.२०,०००/- |
| १२. | श्री. बाळकृष्ण लाड | सहायक पोलीस उप निरीक्षक/१९८६० | रु.१०,०००/- |
| १३. | श्री. राजेश कदम | पोलीस हवालदार लेखनिक /२३७१८ | रु.१०,०००/- |
| १४. | श्री. कमलेशमनी पांडे | पोलीस हवालदार/ २४६७९ | रु.१०,०००/- |
| १५. | श्री. नामदेव राणे | पोलीस हवालदार /३३३८ | रु.१०,०००/- |
| १६. | श्री. उल्हास परब | पोलीस हवालदार /७२६७ | रु.१०,०००/- |
| १७. | श्री.दयाराम मोहिते | पोलीस हवालदार /२४६५१ | रु.१०,०००/- |
| १८. | श्री. सुरेश पाटील | पोलीस हवालदार /२४१०१ | रु.१०,०००/- |
| १९. | श्री. संतोष जाधव | पोलीस हवालदार /७७७८ | रु.१०,०००/- |
| २०. | श्री.कुसुमाकर गडदे | पोलीस हवालदार /२३१६३ | रु.१०,०००/- |
| २१. | श्री. भगवान कदम | पोलीस हवालदार /२५३८८ | रु.१०,०००/- |
| २२. | श्री. विलास गरड | पोलीस हवालदार /२५२४० | रु.१०,०००/- |
| २३. | श्री. विजय भोसले | पोलीस हवालदार /२५७७० | रु.१०,०००/- |
| २४. | श्री. शिवाजी चाकणे | पोलीस नाईक /२६५०७ | रु.१०,०००/- |
| २५. | श्री. सुधाकर कोकाटे | पोलीस नाईक/ २८०७४ | रु.१०,०००/- |

| | | | |
|---|---|---|---|
| २६. | श्री. राजन सावंत | पोलीस नाईक / २७६५० | रु.१०,०००/- |
| २७. | श्री. संतोष संखे | पोलीस शिपाई /९६०२२४ | रु.१०,०००/- |
| २८. | श्री. सचिन सावंत | पोलीस शिपाई /९८०८६९ | रु.१०,०००/- |
| एकूण रुपये पाच लाख फक्त | | | रु.५,००,०००/- |

Charushila Devendra Chaudhari

Digitally signed by Charushila Devendra Chaudhari
DN: CN = Charushila Devendra Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home
Date: 2015.01.06 17:58:26 +05'30'

( चारुशीला चौधरी )
शासनाच्या अवर सचिव